



# महाराष्ट्र शासन

क्रमांकः-गौखनि-३२/०४१८/प्र.क्र.१८६/ख-१

**महसूल व वन विभाग,**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १९ मे, २०२२.

विषयः- गौण खनिज- जळगांव
सन २०१४-२०१५ करीता मौजे बांबरुड खुर्द प्र.प्रा. भाग-१, ता.पाचोरा, जि.जळगांव या वाळूगटाची अनामत व बँक हमीची रक्कम परत करणेबाबत.
**श्री.भरत निवृत्ती देशमुख**

***शासन ज्ञापन :-***

जिल्हाधिकारी, जळगांव यांना त्यांचे पत्र क्र.गौणख/ई-कावि/२०१९/०८१२६/१५२५, दि.२२/७/२०१९ रोजीच्या उपरोक्त विषयावरील पत्रास अनुलक्षून असे कळविण्यात येते की, दिनांक ०७/०२/२०१५ रोजी सन २०१४-१५ करीता घेण्यात आलेल्या लिलावात मौजे बांबरुड खुर्द प्र.प्रा. भाग-१, ता.पाचोरा, जि.जळगांव हा वाळूगट १६७८ ब्रास वाळू परिमाणाकरीता रु.३२,००,०००/- इतक्या सर्वोच्च बोलीस श्री.भरत निवृत्ती देशमुख यांना लिलावाने दि.२/३/२०१५ रोजीच्या जिल्हाधिकारी कार्यालयाच्या आदेशान्वये काही अटी व शर्तीच्या अधीन राहून मंजूर करण्यात आला. लिलावधारक यांनी लिलावाची संपूर्ण रक्कम शासनजमा केल्यानंतर तसेच लिलावधारकासोबत करारनामा करुन वाळूगटाचा ताबा लिलावधारकास देण्यात आला आहे.

०२. सदर कार्यारंभ आदेशातील अटी व शर्तीचा भंग केला असल्याने जिल्हाधिकारी, जळगांव यांनी दि.२८/३/२०१६ रोजीच्या आदेशान्वये कार्यारंभ आदेशातील अट क्र.४,७,१५,१७, २४, २७,४०,४८ व ४९ चा भंग केला असल्याने अनामत रक्कम रुपये ६,३७,६४०/- व बँक हमीची रक्कम रुपये ६४,०००/- जप्त करण्याबाबत आदेश पारीत केलेत. जिल्हाधिकारी, जळगांव यांच्या उक्त आदेशाविरुध्द लिलावधारक यांनी मा.मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे रिट याचिका क्र.७५१२/२०१६ मध्ये मा.न्यायालयाने दि.१९/१२/२०१६ रोजी फेरचौकशी करण्याचे आदेश पारीत केलेत. मा.उच्च न्यायालयाच्या उक्त आदेशानुसार जिल्हाधिकारी, जळगांव यांनी दि.२४/४/२०१७ रोजी केलेल्या फेरचौकशीमध्ये त्यांचे दि.२८/३/२०१६ रोजीचे आदेश कायम केलेत.

जिल्हाधिकारी, जळगांव यांचे दि.२४/४/२०१७ रोजीच्या आदेशाविरुध्द लिलावधारक यांनी अपर विभागीय आयुक्त, नाशिक यांच्याकडे अपील अर्ज दाखल केला. त्यावर अपर विभागीय आयुक्त, नाशिक यांनी दि.८/११/२०१७ रोजीच्या आदेशान्वये अर्जदार लिलावधारक यांचा अपील अर्ज फेटाळून जिल्हाधिकारी, जळगांव यांचे दि.२४/४/२०१७ रोजीचे आदेश कायम केलेत. तद्नंतर लिलावधारक श्री.देशमुख यांनी अपर विभागीय आयुक्त, नाशिक यांच्या दि.८/११/२०१७ रोजीच्या आदेशाविरुध्द मा.राज्यमंत्री (महसूल) यांच्याकडे अपील अर्ज दाखल केला. त्यावर मा.राज्यमंत्री (महसूल) यांनी दि.५/३/२०१९ रोजी

लिलावधारक यांना जप्त केलेली अनामत रक्कम व बँक हमी रक्कम वादी यांना परत करण्याबाबत आदेश पारीत केले आहेत.

०३. सबब, मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे दि.५/३/२०१९ रोजी पारीत केलेल्या आदेशानुसार लिलावधारक श्री.भरत निवृत्ती देशमुख यांना अनामत रक्कम रुपये ६,३७,६४०/- (रुपये सहा लाख सदोतीस हजार सहाशे चाळीस फक्त) व बँक हमीची रक्कम रुपये ६४,०००/- (रुपये चौसष्ट हजार फक्त) अशी एकूण रक्कम रु.७,०१,६४०/- (रुपये सात लाख एक हजार सहाशे चाळीस फक्त) यापूर्वी प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापूर्वी ही रक्कम अदा केलेली नाही, याबाबतची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

०४. या बाबीवर होणारा खर्च सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता "०८५३-अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग" १०२-खनिजाबाबत सवलत फी व स्वामित्वधन,९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग-वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या अंदाजपत्रकीय तरतुदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

०५. सदर शासन ज्ञापन, वित्त विभागाच्या क्र.विअप्र-२०१९/ प्र.क्र.२०/ २०१९/ विनियम, दि.८/८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग-२ नुसार महसूल व वन विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२२०५१९१५५०४३१९१९ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SHIVAJI SONAJI CHOURE

Digitally signed by SHIVAJI SONAJI CHOURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fa37c7e079f23b78a27c84b9d6e46f94d549fc79ba170d5815f3619617b13313, pseudonym=0592554E096862442D21372FBE05C91C3D50FA17, serialNumber=03FE2B2D715BED4B0D90A99525AE06946672E68EA905C97DA50B34FD21223011, cn=SHIVAJI SONAJI CHOURE
Date: 2022.05.19 15:52:29 +05'30'

( शिवाजी चौरे )
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

जिल्हाधिकारी, जळगांव

**प्रत:-**

१) विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०० ०२०.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०० ०२०.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, जळगांव
५) वित्त विभाग (व्यय-९/अर्थसंकल्प-३/६/१४ कार्यासने) मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६) कार्यासन अधिकारी (कार्यासन ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७) निवडनस्ती (कार्यासन “ख-१”), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.